**४० चे प्रमाणपत्र मंजूरी मिळण्याबाबत कंत्राटी सुरक्षा सेवेची देयके अदा करण्यास मान्यता व अनुदान मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः सुरक्षा-२०२४/ प्र.क्र.११९/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

**दिनांक :** २८ मार्च, २०२४

वाचा

१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि-२०१०/प्र.क्र.८४/१०/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.०८.२०१६.
२) उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-३/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालय(राज्यस्तर) मुंबई, यांचे पत्र क्र. आसेआ/कक्ष ३/टे-९/सुरक्षा सेवाप्रलंबित देयके/२५०१-२५०५/२४, दि.१४.०१.२०२४.

**प्रस्तावना :**

उपसंचालक, आरोग्य सेवा नागपूर मंडळ, नागपूर यांनी जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय भंडारा अंतर्गत वैद्यकीय अधीक्षक,उपजिल्हा रुग्णालय, साकोली व ग्रामीण रुग्णालय, पवनी जिल्हा भंडारा येथील येथील सुरक्षा रक्षक सेवेच्या माहे जुलै २०१९ ते सप्टेंबर २०१९ व मार्च २०१९ ते मे २०२० या कालावधीतील देयकाना मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, भंडारा अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय,साकोली व ग्रामीण रुग्णालय,पवनी जिल्हा भंडारा येथील सुरक्षा रक्षक सेवेची माहे जुलै २०१९ ते सप्टेंबर २०१९ व मार्च २०१९ ते मे २०२० या कालावधीची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रुपये ७,०९,४१२/- (रुपये सात लाख नऊ हजार चारशे बारा फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर देयके अदा करण्यासाठीचा खर्च वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(०८) प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे(अनिवार्य) (२२१००४१३)किंवा मागणी क्रमांक आर-१,२२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(०९) महाराष्ट्र १ आरोग्य विकास प्रकल्पातर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयाची जिल्हा रुग्णालयाइतका दर्जा वाढविण (अनिवार्य) (२२१० ४६२४) या लेखाशीर्षाखालील १०-कंत्राटी सेवा/१३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टासाठी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर देयके योग्य असल्याची तसेच

प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी,याबाबतची जबाबदारी जिल्हा शल्यचिकित्सक, भंडारा यांची राहील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, अन्वये, वित्तिय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग - पहिला, उपविभाग-तीन मधील अ.क्र.६ नियम क्रमांक ४० अनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२२१३५८०४१११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81E4E52421D72A2AE32DF6C7D06ABB4E6A7B5820C3A929F328AD6C0DCA4F38C7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2024.03.28 12:01:40 +05'30'

( नीलम संगवई )
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय अभियान,आरोग्य भवन,मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा-१,आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२,आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
८. उपसंचालक,आरोग्य सेवा,नागपूर मंडळ, नागपूर.
९. जिल्हा शल्यचिकित्सक,जिल्हा रुग्णालय, भंडारा.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी,भंडारा.
११.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती ( आरोग्य-४ ).